**मौजे पंचनदी,ता. दापोली, जि. रत्नागिरी येथील मुख्य नदीच्या डाव्या तीरावरील पूर सरंक्षक भिंत बांधणेच्या कामाचे प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: पुसंभि-२०२३/ (प्र.क्र. ११६/२०२३)/ सिं.व्य.(महसूल)**

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: ०९/०७/२०२४

**वाचा** : १) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू १०९२/१७०-सिंव्य,(कामे) दिनांक ७/०८/ १९९२

२) शासन निर्णय क्र. पूसंभि २०१९/(प्र.क्र.११५/२०१९) सिंव्य.(म) दि.३१/८/२०१९

**प्रस्तावना :-**

पंचनदी या गावातील मुख्य नदीवर लघु पाटबंधारे योजनेचे काम सन १९८६ मध्ये पूर्ण करण्यात आले आहे. सदर माती धरणाची एकुण लांबी १८० मी. व उंची २४.९२ मी इतकी असून धरणाची महत्तम विसर्ग ७३.९७ घ.मी./से. आहे. सन १९९० साली पावसाळी हंगामामध्ये पुरजन्य परिस्थितीमुळे नदी पात्रातील मोठया प्रवाहामुळे धरणाच्या अधोबाजुस अंदाजे १ ते १.५० कि.मी. अंतरावर असलेल्या नदीच्या डाव्या तीरावर शेतकऱ्यांची शेत जमीन २० ते २५ फुट नदीच्या पात्रात वाहून गेली आणि दरवर्षी पुरामुळे ४ ते ५ फुट जमीनीची धुप होऊन माती वाहून नदीचे पात्र बदलत आहे. त्यानुषंगाने पंचनदी येथे पूरामुळे सदर ठिकाणी मोठे नुकसान झाल्याने स्थानिक लोकप्रतीनिधींनी नवीन पूरसंरक्षक भिंत बांधून मिळणेबाबत मागणी केलेली आहे. त्यानुसार मौजे पंचनदी, ता. दापोली, जि.रत्नागिरी येथील पंचनदी नदीकाठी आवश्यक तेथे पूर संरक्षक भिंत बांधकाम करणेचे ठिकाणी क्षेत्रीय कार्यालयाने प्रत्यक्ष पाहणी करून अंदाजपत्रक तयार करणेत आले आहे. सदर मौजे पंचनदी, ता. दापोली, जि.रत्नागिरी येथील पंचनदी नदीकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे अंतर्गत मौजे पंचनदी, ता. दापोली, जि.रत्नागिरी येथील पंचनदी वरील पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रस्तावित पूर संरक्षक भिंत बांधण्याच्या कामासाठी रु. २७३२७०१६.००/- (दोन कोटी त्रेहात्तर लक्ष सत्तावीस हजार सोळा रुपये) एवढया खर्चाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०२२-२३ व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

क) शासन निर्णय क्रमांक पुसंभि-२०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/सिंव्य(म)दिनांक ३१/०८/२०१९ मधील तरतूदी नुसार कार्यवाही करावी.

ख) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे /संकल्पने, दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

ग) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे.

घ) अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे /संकल्पने, दरसूची बाहय बाबी व वहन अंतरे सक्षम स्तरावर तपासून अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता प्रदान करावी.

च) कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करावयाचा आहे. या कामांना सुधारित प्रशासकीय मान्यता दिली जाणार नाही.

छ) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधितांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची, दक्षता घ्यावी.

ज) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

झ) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक मौजे पंचनदी, ता. दापोली, जि.रत्नागिरी येथील पंच नदीकाठी पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास रत्नागिरी जिल्हा परिषद, रत्नागिरी ने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र प्राप्त करून घेण्याची जबाबदारी सक्षम अधिका-यांची असेल.

ट) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे. पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची, दक्षता घ्यावी.

ठ) पूर संरक्षक/घाटाचे योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

ड) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक भिंत मौजे पंचनदी, ता. दापोली, जि.रत्नागिरी येथील जिल्हा परिषदेने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. काम सुरू करण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र प्राप्त करून घ्यावे.

ढ) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च “**४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०- सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०१) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे भागभांडवली अंशदान (४७११ २८४७)” ५४** या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ६१/ सन २०२४ वर नोंदविण्यात आलेली आहे.

वित्तीय अधिकार नियमपुस्तिका - १९७८ भाग पहिला मधील तरतुदीनंतर प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकार व आंतरवित्तीय सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०७०९१५३७५९४०२७ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.07.09 15:49:17 +05'30'

**( सो.आ.गायकवाड )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव, मलबार हिलमुंबई ,

२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई ,

३) मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा)यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय मुंबई ,

४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन)यांचे सचिव, मंत्रालय मुंबई ,

५) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई

६) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन,मुंबई

७) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई

८) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

९) अपर मुख्य सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई

१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,

११) महालेखापाल-१ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

१२) महालेखापाल-२ (लेखा वअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१३) कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे,

१४) मुख्यअभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, मुंबई

१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,

१६) अधीक्षक अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी,

१७) सिं.व्य.(महसूल) कार्यासन संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्रमांक : पुसंभि-२०२३/ (प्र.क्र.११६/२०२३)/ सिंव्य (महसूल),**

**दि:- ०९/०७/२०२४ चे सहपत्र**

**परिशिष्ट**

| Sr.No. | Description of Item | Amount |
|---|---|---|
| १ | C - Works (excluding Royalty) | २२३५९१४५.०० |
| २ | Royalty | ७१९६३४.०० |
| ३ | १ % Insurance | २२३५९१.०० |
| ४ | १८ % GST | ४०२४६४६.०० |
| | **Total Rs.** | **२७३२७०१६.००** |

SONAL ANAND GAIKWAD
Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.07.09 15:49:32 +05'30'

**( सो.आ.गायकवाड )**
**शासनाच्या अवर सचिव**